सन २०११-१२ मध्ये "**किसान रोपवाटिका**" या योजनेस प्रशासकीय मान्यता व अनुदान वितरणास मंजुरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलएफ-२०११/ प्र.क्र. ८४/ जल-१२,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : २२ जून, २०११**

**संदर्भ :-**

१) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्रमांक एसएलएफ-१४९३/प्र.क्र.२०/जल-१४, दि.१४ मे, १९९३
२) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्रमांक एसएलएफ-२००८/प्र.क्र.४२/जल-१२, दि.१२मे, २००८
३)ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र. एसएलएफ-२००९/प्र.क्र३३ /जल-१२, दि.२८.४.२००९
४)वित्त विभाग, परिपत्रक क्र.अंदाज-२०११ /प्र.क्र.९३ /२०११/अर्थसंकल्प-३, दि. ६ मे,२०११
५)ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.असक-२०११/प्र.क्र.२५/जल-११, दि.२० मे,२०११
६)संचालक,सामाजिक वनीकरण,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र.कक्ष-१/वायो/.२७/१०-११/६५/११-१२/ दि.१३.४.२०११

**प्रस्तावना :**

किसान रोपवाटिका ही १००% केंद्र पुरस्कृत योजना राज्यात १९८६-८७ पासून राबविण्यात येत आहे. सन१९९२-९३ या आर्थिक वर्षापासून केंद्र शासनाने ही योजना राज्याकडे हस्तांतरीत केली आहे. सन १९९३-९४ पासून राज्यात सुधारीत किसान रोपवाटीका योजना राबविण्यात येत आहे. ही योजना सन २००९-१० मध्ये राबविण्यास संदर्भाधीन दिनांक २८.४.२००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजना सन २०११-१२ या आर्थिक वर्षात पुढे चालू ठेवण्यास तसेच त्याकरीता अनुदान वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सामाजिक वनीकरणांतर्गत **-किसान रोपवाटिका** ही योजना सन २०११-१२ या आर्थिक वर्षात पुढे चालू ठेवण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. तसेच, सन २०११-१२ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागांतर्गत **"किसान व रोपवाटिका"** योजनेसाठी रु.६६.०० लाख इतका निधी मार्च २०११ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात अर्थसंकल्पित करण्यास मंजुरी दिली आहे. या अर्थसंकल्पीत निधीपैकी माहे एप्रिल व डिसेंबर, २०११ या नऊ महिन्यांकरिता रु. ३८.२३ लाख ( रुपये अडतीस लाख तेवीस हजार फक्त) इतके अनुदान मंजूर व वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदरहू मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. सदर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास महासंचालक, सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी सदर योजनेची अंमलबजावणी प्रचलीत अटी व शर्तीच्या अधिन राहून करावी. तसेच, जिल्हानिहाय तरतुद वितरणाची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा / झालेल्या खर्चाचा तपशील देखिल शासनास सादर करण्यात यावा.

५. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.एल-३, २४०६ वनीकरण व वन्यजीवन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना-(०४)(०२) किसान रोपवाटिका (२४०६ १७३५) -योजनांतर्गत - दत्तमत**

६. वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दिनांक-६ मे,२०११ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार आणि प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार मा. प्रधान सचिव (जलसंधारण) यांच्या मान्यतेने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक -**२०११०६२३१५०३५४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**(श्या. र. चौरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
प्रधान, मुख्य वनसंरक्षक व महासंचालक,सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व सहसंचालक . सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
महालेखापाल, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
कार्यासन अधिकारी, व्यय-१५,अर्थसंकल्प -१७ विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र.१४३२, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी (सर्व) , ग्रा.वि.व ज.सं.वि.,मंत्रालय,मुंबई-३२
निवडनस्ती/जल-१२.